**महाराष्ट्र पर्यटनविषयक प्रसिध्दी मोहिम राबविण्यासाठी मे.डीडीबी मुद्रा या एजन्सीद्वारे तयार करण्यात येणाऱ्या नवीन TVC व Creative बाबत येणाऱ्या खर्चास मान्यता देवून निधी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : बैठक २०१६/६/प्र.क्र. ४६०/पर्यटन,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १९ जून, २०१८.

वाचा :
१. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक- टीडीसी २०१६/१२/प्र.क्र. ५०९/पर्यटन, दिनांक २०.१.२०१८.
२. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक- टीडीसी २०१६/१२/प्र.क्र. ५०९/पर्यटन, दिनांक १५.३.२०१८.
३. महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाचे पत्र, क्रमांक- मपविम/प्रवजसं/८५७/२०१७/४४८६, दिनांक ३०.७.२०१६.
४. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, पत्र क्रमांक- बैठक २०१६/६/प्र.क्र. ४६१/पर्यटन, दिनांक ६.३.२०१७.
५. महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाचे पत्र क्रमांक- मपविम/प्रवजसं/८५५/२०१७/६३८६, दिनांक २९.११.२०१७.

**प्रस्तावना :**

मे.डीडीबी मुद्रा यांच्या महाराष्ट्रातील किल्ले व समुद्र किनाऱ्यावरील टीव्हीसी फिल्म बनविण्यासाठीच्या स्क्रिप्टमध्ये “मी महाराष्ट्र” ऐवजी “सुपहिट महाराष्ट्र” असा बदल झाल्याने मूळ निर्मिती मुल्य रुपये ४.८५ कोटी (+ एजन्सी शुल्क + कर) यामध्ये वाढ होऊन निर्मिती मुल्य रुपये ७.८८ कोटी इतके झाले. त्याअनुषंगाने एजन्सी शुल्कात व करात वाढ होऊन त्याची एकूण किंमत वरीलप्रमाणे रुपये ९,४२,१३,७५०/- एवढी झाली. हा प्रस्ताव दोन भागात विभागण्यात येऊन संदर्भाधीन क्रमांक- ९ येथील दिनांक ६.३.२०१७ च्या शासन पत्रान्वये डीडीबी मुद्राला “मी महाराष्ट्र” हे थीम ॲन्थेम तयार करण्यासाठी प्रथमत: रुपये ४.१५ कोटी + एजन्सी शुल्क + कर या कामास मान्यता देण्यात आलेली आहे. उर्वरित दुसऱ्या भागाच्या (रुपये २.४६५० कोटी + एजन्सी फी + कर) रुपये ३,१८,९०,९३७/- रकमेच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मे.डीडीबी मुद्रा यांच्या महाराष्ट्रातील किल्ले व समुद्र किनाऱ्यावरील टीव्हीसी फिल्म बनविण्यासाठीच्या स्क्रिप्टमध्ये बदल झाल्याने मूळ निर्मिती मुल्य रुपये ४.८५ कोटी + कर + एजन्सी शुल्क यामध्ये निर्मिती मुल्य वाढुन ते रुपये ७.८८ कोटी झाले. हा प्रस्ताव दोन भागात विभागून पहिल्या भागातील रुपये ४.१५ कोटी + इतर या कामाचे आदेश दिलेले आहेत. उर्वरित दुसऱ्या भागातील कामासाठी रुपये ३,१८,९०,९३७/- (अक्षरी रुपये तीन कोटी अठरा लक्ष नव्वद हजार नऊशे सदतीस फक्त) इतका निधी खर्च करण्यास महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने सदर प्रकरणी टीव्हीसी च्या प्रसारणासाठीच्या निवारणार्थ उचित निर्णय घेण्याच्या अटीवर या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर मान्यता, समक्रमांकित शासन निर्णय दिनांक २०.१.२०१८ व १५.३.२०१८ मधील तरतूदी अटी व शर्तींच्या अधिन देण्यात येत आहे.

२. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक- टीडीसी २०१६/१२/प्र.क्र. ५०९/पर्यटन, दिनांक २०.१.२०१८ व १५.३.२०१८ अन्वये खंडश: प्रध्दिी आराखड्यास मान्यता दूऊन अनुक्रमे रुपये १२.२५ कोटी आणि रुपये ३१.२६ कोटी निधी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाला वितरित करण्यात आला आहे. या निधीतून वरील खर्च भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सकेतांक २०१८०६१९१२४४५१५५२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra
Laxmikant Lakhote

Digitally signed by Ravindra Laxmikant Lakhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ae5e5678dc8c9d9c01f7043448a53f6a9fbe81e46d183af43c9a9e01eb42c7c7, serialNumber=93c11f919f0c5fba6953b4841cc8cfd46b2b788da139e3f21b3d79d2cf976efa, cn=Ravindra Laxmikant Lakhote
Date: 2018.06.19 12:46:05 +05'30'

( र.ल.लखोटे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री, पर्यटन यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री, पर्यटन यांचे खाजगी सचिव
४. प्रधान सचिव, पर्यटन
५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
७. महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
८. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.
९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
१३. वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई.
१४. सामान्य प्रशासन विभाग का.३४
१५. अवर सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग (अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती.